**उद्योग क्षेत्रातील गुंतवणूकदारांना औद्योगिक परवाने व मान्यता तातडीने देण्यासाठी सचिवांची शक्तीप्रदान समिती गठीत करणे....**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक- मेइम- २०१४ / प्र.क्र. ८८/उद्योग-८**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक ८/१/२०१५

**पहा- १)** शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक-ई-बीझ-२०१३/प्र.क्र.११७/उद्योग-८ दिनांक १/३/२०१४.

**प्रस्तावना-**

राज्यात "मेक इन महाराष्ट्र" हा महत्त्वाकांक्षी उपक्रम यशस्वीरित्या राबवून औद्योगिक उत्पादन क्षेत्रात उद्योजकांना कोणताही उद्योग चालू करण्यासाठी एक महिन्यात परवानग्या प्राप्त करून देण्यात येतील असे मा. मुख्यमंत्री महोदयांनी याविषयी दिनांक १७/११/२०१४ रोजी झालेल्या बैठकीत आश्वासित केले आहे. सदर आश्वासन पूर्तीकरिता औद्योगिक परवाने तातडीने उद्योजकांना उपलब्ध करून देण्यासाठी संबंधित सचिवांची शक्तीप्रदान समिती गठीत करण्याबाबत देखील सदर बैठकीत निर्देश देण्यात आले होते.

**शासन निर्णय:-**

राज्यात "मेक इन महाराष्ट्र" हा नाविन्यपूर्ण उपक्रमाचा भाग म्हणून राज्यात गुंतवणूक करणाऱ्या उद्योगांना लागणाऱ्या विविध परवाने/ संमती जलद गतीने (Fast Track Approvals) उपलब्ध करून देण्यासाठी सचिवांची शक्तीप्रदान समिती गठीत करण्यास पुढीलप्रमाणे शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अ) शक्तीप्रदान समितीची रचना**

१) मा. मुख्य सचिव - अध्यक्ष
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव - सदस्य
३) अपर मुख्य सचिव (वित्त) - सदस्य
४) अपर मुख्य सचिव (पर्यावरण) - सदस्य
५) प्रधान सचिव (ऊर्जा) - सदस्य
६) प्रधान सचिव (उद्योग) - सदस्य
७) प्रधान सचिव (नवि-१) - सदस्य
८) प्रधान सचिव (नवि-२) - सदस्य
९) प्रधान सचिव (महसूल) - सदस्य

१०) प्रधान सचिव (कामगार) - सदस्य
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ- सदस्य
१२) विकास आयुक्त (उद्योग) - निमंत्रक

**ब) उच्चाधिकार समितीच्या बैठकीची रूपरेषा:-**

१) राज्यात औद्योगिक उत्पादन क्षेत्रात गुंतवणूक करणाऱ्या उद्योजकांना सर्व औद्योगिक परवाने व मान्यता तातडीने व सुलभरित्या संबंधित विभागाने विहीत केलेल्या कालावधीत उपलब्ध करून न दिल्यास सदर शक्तीप्रदान समिती अशा प्रकरणांचा आढावा घेईल.

२) शक्तीप्रदान समितीसमोर आलेल्या विहीत कालावधीत परवाने प्राप्त न झालेल्या प्रकरणी संबंधित विभागास येणाऱ्या अडचणींबाबत विचारणा करण्यात येईल. जर अशा प्रकरणी धोरणात्मक / वैधानिक अडचणीची बाधा येत नसल्यास अशा प्रकरणी तातडीने निश्चित कालावधीत निर्णय घेण्यास समिती निर्देश देईल.

३) शक्तीप्रदान समितीसमोर आलेल्या प्रकरणी परवाने प्राप्त करण्यासाठी अन्य विभागाच्या ना हरकतीमुळे विलंब होत असल्यास अशा प्रकरणी शक्तीप्रदान समितीच्या बैठकीत त्याचवेळी निर्णय घेण्यात येईल.

४) शक्तीप्रदान समितीसमोर आलेल्या विहीत कालावधीत परवाने प्राप्त न झालेल्या प्रकरणी संबंधित विभागास जर धोरणात्मक / वैधानिक अडचण असल्यास अशा प्रकरणी धोरणात्मक बदल सुचवून शासन निर्णय क्रमांक- मेइम- २०१४ / प्र.क्र. ८८/उद्योग-८ दिनांक ८/१/२०१५ अन्वये गठीत मा. मुख्यमंत्री महोदयांच्या मंत्रिमंडळ उप समितीच्या निर्णयार्थ सादर करण्याची शिफारस करेल.

५) सदर शक्तीप्रदान समिती प्रत्येक महिन्याच्या दुसऱ्या शुक्रवारी सकाळी १०.३० वा प्राप्त झालेल्या प्रकरणांचा आढावा घेईल. शक्तीप्रदान समितीची बैठक शक्यतो एकात्मिक सुलभता कक्ष,महाराष्ट्र राज्य लघुउद्योग विकास महामंडळ, (MSSIDC), कृपा निधी, ९, वालचंद हिराचंद मार्ग, बॅलार्ड इस्टेट, मुंबई ४०० ००१ या ठिकाणी आयोजित करण्यात येईल.

६) शक्तीप्रदान समितीच्या बैठकीचे आयोजन व समन्वयन विकास आयुक्त) उद्योग (यांनी करावे व बैठकीचे समन्वयन व इतिवृत्त इ .बाबत कार्यवाही करावी.

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१५०१०८१५०७३५८९१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shankarrao Ingle

Digitally signed by Sanjay Shankarrao Ingle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sanjay Shankarrao Ingle
Date: 2015.01.08 15:40:31 +05'30'

**( संजय इंगळे)**
उप सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव (पर्यावरण), पर्यावरण विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (ऊर्जा), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (महसूल(, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई

**प्रतिलिपी,**

१. मा. मुख्य सचिव यांचे वरीष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.